


**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन ज्ञापन क्र.संकीर्ण-२०२२/७३४/प्र.क्र.१३२/कार्यासन -६**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२

दिनांक :- ३०.०५.२०२३

**विषय** :- कै.श्रीमती अलका विजय राऊत, सहायक कक्ष अधिकारी, मुंबई उच्च न्यायालय यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.

**संदर्भ** :-१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक १४.०५.२०२१.

२) वित्त विभागाचे पत्र क्र.न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९, दिनांक २८.०१.२०२१

३) प्रबंधक, ( वित्त व अर्थ ) मुंबई उच्च न्यायालय यांचे पत्र क्र:एफअँडबी/ओबीएस/कोवीड-१९/एक्स ग्रेशिया/३४१८, दिनांक ०९.०६.२०२२

४) प्रबंधक, ( वित्त व अर्थ ) मुंबई उच्च न्यायालय यांचे पत्र क्र:एफअँडबी/ओबीएस/कोवीड-१९/एक्स ग्रेशिया/१२९४, दिनांक २०.०२.२०२३

**ज्ञापन :-**

उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई येथे कार्यरत असलेल्या कै.श्रीमती अलका विजय राऊत, सहायक कक्ष अधिकारी, मुंबई उच्च न्यायालय ह्या कोव्हीड -१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर कर्तव्य व जबाबदारी पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक २१.०४.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. प्रबंधक ( वित्त व अर्थ ) मुंबई उच्च न्यायालय यांनी उक्त मृत सहायक कक्ष अधिकारी कै.श्रीमती अलका विजय राऊत, यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. प्रबंधक ( वित्त व अर्थ ) मुंबई उच्च न्यायालय यांनी कै.श्रीमती अलका विजय राऊत, सहायक कक्ष अधिकारी, यांना वेद हॉस्पीटल, सुपर स्पेशालिटी अँड मेडीकल रिसर्च प्रा.लि., कोन, भिवंडी येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात त्या कार्यालयात कर्तव्यावर हजर होत्या असे प्रमाणपत्र सादर केले आहे.

४. वेद हॉस्पीटल, सुपर स्पेशालिटी अँड मेडीकल रिसर्च प्रा.लि., कोन, भिवंडी यांनी कै.श्रीमती अलका विजय राऊत यांचा मृत्यू हा कोविड-१९ या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्रामध्ये नमुद केले आहे.

५. निबंधक (जन्म व मृत्यू) , गट विकास अधिकारी, ग्रामपंचायत, कोन, तालुका भिवंडी, जिल्हा ठाणे यांनी कै.श्रीमती राऊत यांचा मृत्यू हा दिनांक २१.०४.२०२१ रोजी झालेला असल्याचे मृत्यू प्रमाणपत्र दिले आहे.

६. प्रबंधक (वित्त व अर्थ) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ०९.०६.२०२२ रोजीच्या पत्रामध्ये कै.श्रीमती अलका विजय राऊत, सहायक कक्ष अधिकारी, यांचे पती श्री. विजयकुमार डी.राऊत यांनी रु.५० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा दिनांक २०.०५.२०२१ रोजीचा विनंती अर्ज त्यांना सादर केला असल्याचे नमूद केले आहे.

७. उपरोक्त बाबी लक्षात घेता, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई येथे कार्यरत असलेल्या सहायक कक्ष अधिकारी, कै.श्रीमती अलका विजय राऊत, यांच्या कुटुंबियांना रक्कम रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. उक्त खर्च "मागणी क्रमांक जे-१, मुख्य लेखाशीर्ष २०१४- न्यायदान, (०२)(०३) अपिल शाखा भारित (०३) (०१) प्रबंधक-अपील शाखा (अनिवार्य) (भारित) (२०१४००९२) या लेखाशिर्षाखालील १३-कार्यालयीन खर्च " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ तसेच वित्त विभागाचे पत्र क्र.न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९, दिनांक २८.०१.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५३०१७०१४८१११२ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN ARUN KUMBHOJKAR

Digitally signed by PRAVIN ARUN KUMBHOJKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=87a3595a52aa9c93dd11cf6d08eb9c32c251f94716de23ff63e49022fdaff41f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=27C674EF79FE187EBCDF4FA9C80062ECA97A210FB0D7B7554B8FA6D755925AD1, cn=PRAVIN ARUN KUMBHOJKAR
Date: 2023.05.30 17:03:31 +05'30'

**(प्रविण अ.कुंभोजकर )**
**उप विधि सल्लागार नि उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

प्रबंधक ( वित्त व अर्थ ), मुंबई उच्च न्यायालय, मुंबई-४०० ०३२.

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
३) श्री. विजय कुमार डी.राऊत, साई बाळाराम कॉम्प्लेक्स २०३, दुसरा मजला, बिल्डींग नं.,१, सुभाष रोड, संकेश्वर पाम समोर, डोंबिवली (पश्चिम)- ४२१ २०२
४) निवडनस्ती, कार्यासन-६.